**महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिम २०१६-१७ ची जाहिरात दुरदर्शन व आकाशवाणीवर प्रसिध्द केलेल्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तंमुगा-०११७/प्र.क्र. ०९ /पोल-१५**
मंत्रालय, मुंबई- ४०० ००३२
**दिनांक : १५ मार्च, २०१७.**

**वाचा :** १) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांकः तंमुगा-१००८/प्रक्र-४३/२००८/पोल-१५, दि. ०४.०८.२००८.

२) पोलीस महासंचालक, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/४०/९०६९/मगांतंमुगा-वृत्तपत्र-जाहिरात २०१६-१७/४७/२०१६, दिनांक १४.०२.२०१७.

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७.०४.२०१५

**प्रस्तावना :**

उपरोक्त शासन निर्णय क्र.१ मधील तरतूदीनुसार महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिमेची जाहिरात दरवर्षी दूरदर्शन, आकाशवाणी तसेच राज्यातील "ब" व "क" वर्गवारीतील वृत्तपत्रामधून प्रसारित करण्यात येत आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.मावज-२०१३/प्र.क्र.४२३/३४, दिनांक २४.१२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये शासकीय योजना व विकास कामे यांची माहिती देणारे ५४ माहितीपट निर्माता यादीस मंजूरी दिलेली आहे. सदर यादी ही दिनांक ३१ ऑक्टोबर,२०१६ पर्यत अस्तित्वात रहाणार असल्याने मोहिम वर्ष २०१६-१७ करिता खाजगी माहितीपट निर्मात्यांकडून माहिमेच्या जाहिरातीसाठी संकल्पना व दरपत्रके मागवून गठीत केलेल्या समितीसमोर ठेवण्यात आलेले आहेत. सदर समितीने शासनमान्य खाजगी माहितीपट निर्मात्यांपैकी ३ प्रकारच्या जाहिरातीसाठी (१) दूरदर्शन जाहिरातीसाठी- मे.आशय निर्मित, मुंबई, (२) आकाशवाणी जाहिरातीसाठी- मे.अध्यक्ष, बहुरंग, पुणे व (३) वृत्तपत्र जाहिरातीसाठी- मे.फुलराणी ॲडव्हेटायझिंग ॲन्ड मार्केटिंग, मुंबई यांची उत्तम संकल्पना लक्षात घेऊन निवड केली होती.

शासनाने उपरोक्त निवड केलेल्या ३ माहितीपट निर्मात्यांची जाहिरात सन २०१६-१७ मध्ये पुढे चालू ठेवण्यास शासनाने क्र.तंमुगा-०७१६/प्र.क्र.५५/पोल-१५, दिनांक २.८.२०१६ च्या पत्रान्वये मान्यता दिलेली होती. त्यानुसार महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिम सन २०१६-१७ करीता दिनांक १२ ते १५ ऑगस्ट,२०१६ रोजी दुरदर्शन व आकाशवाणीवर जाहिरात प्रसारित करण्यात आलेले चार देयके या विभागास प्राप्त झालेली आहेत. या देयकावर रुपये ७,८८,८७७/- (रुपये सात लाख अठ्ठ्याऐंशी हजार आठशे सत्त्याहत्तर फक्त) एवढा खर्च येणार असून त्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिम सन २०१६-१७ योजनेंतर्गत दिनांक १२ ते १५ ऑगस्ट,२०१६ रोजी खाली दिलेल्या माहितीपट निर्मात्यांनी दुरदर्शन व आकाशवाणीवर प्रसिध्द

केलेल्या जाहिरातीसाठी रुपये ७,८८,८७७/- (रुपये सात लाख अठ्ठयाऐंशी हजार आठशे सत्त्याहत्तर फक्त) एवढ्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | जाहिरातीचा प्रकार | देयक क्रमांक व दिनांक | देयक रुपये |
|---|---|---|---|
| १ | दुरदर्शन | MUM/२९५/GOVT/APRIL/२०१६, दि. ०१/०९/२०१६ | ४,६५,७५०/- |
| २ | आकाशवाणी | ३१/MUMSHUST९०/AUGUST २०१६, दि.निरंक | १,३४,१९१/- |
| | | ३२/MUMSHUST९०A/AUGUST २०१६, दि.निरंक | १,३४,१९१/- |
| ३ | झी २४ तास | ४०००१५५३८९/१६-१७, दि.१५/०८/२०१६ | १८,८३७/- |
| ४ | आयबीएन लोकमत | LOK-FCT-१६४६९, DT. ३१/०८/२०१६ | ३५,९०८/- |
| | | **एकूण :-** | **७,८८,८७७/-** |

२. प्रमाणित करण्यात येते की, सदरहू खर्च यापूर्वी अदा करण्यात आलेला नाही.

३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे सदर देयकाच्या रुपये ७,८८,८७७/- (रुपये सात लाख अठ्ठयाऐंशी हजार आठशे सत्त्याहत्तर फक्त) इतक्या रकमेचे धनादेश तयार करुन संबंधितांना त्यांचे वितरण करतील. सदरचा खर्च महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिमेची प्रसिध्दी व प्रचार यावरच विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावा.

४. या बाबीवर होणारा खर्च रुपये ७,८८,८७७/- (रुपये सात लाख अठ्ठयाऐंशी हजार आठशे सत्त्याहत्तर फक्त) मागणी क्रमांक बी-१, "प्रधान लेखाशीर्ष २०५५ पोलीस (००) (१०) तंटामुक्त गांव मोहिम (२०५५ ०५३३) २६-जाहिरात व प्रसिध्दी" याखाली दर्शवून सन २०१६-१७ या वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र. ३ मधील शासन निर्णयाच्या अनुक्रमणीकेतील अ.क्र.३८ मधील, परिशिष्टामधील अ.क्र.८ मधील नियम १७ अन्वये आणि सदर शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या प्रत्येक मार्गदर्शन तत्वाचे पालन करुन व प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०३१५१६३६५९७९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hussein Alimiya Mukadam

Digitally signed by Hussein Alimiya Mukadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Hussein Alimiya Mukadam
Date: 2017.03.16 17:35:26 +05'30'

**( हु. अ. मुकादम )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई. (४ देयकांसह)

२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई (३ प्रती)
४. महालेखापाल (लेखा व अनुदेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र शासन, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (३ प्रती)
६. निवासी लेखा व परीक्षा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग (व्यय-७) मंत्रालय, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
९. अवर सचिव, अर्थसंकल्प, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती, (पोल-१५).